**गु.प्र.शा. गु.र.क्र. १९५/२०१९, (पवई पो.स्टे.मुंबई, गु.प्र.क्र.६७२/२०१९) या गुन्हे प्रकरणी मा. विशेष मोक्का न्यायालय, सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. अजय मिसर यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी ०३२०/प्र.क्र.५९/पोल-१०**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: २९ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ :-** विधी व न्याय विभाग, शासन आदेश क्र. एसपीपी-२०२०/यु.ओ.आर.२३/का-१४. दिनांक २५ सप्टेंबर, २०२०

**प्रस्तावना:-**

गु.प्र.शा. गु.र.क्र. १९५/२०१९, (पवई पो.स्टे.मुंबई, गु.प्र.क्र.६७२/२०१९) या गुन्हे प्रकरणी मा. विशेष मोक्का न्यायालय, सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल न्यायालयीन प्रकरणात न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी संदर्भाधीन अधिसूचने अन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आलेल्या ॲड. श्री. अजय मिसर यांना व्यावसायिक फी अदा करण्याची बाब शासन विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

गु.प्र.शा. गु.र.क्र. १९५/२०१९, (पवई पो.स्टे.मुंबई, गु.प्र.क्र.६७२/२०१९) या गुन्हे प्रकरणी मा. विशेष मोक्का न्यायालय, सत्र न्यायालय, मुंबई येथे दाखल न्याय प्रकरण निकाली निघेपर्यंत, ॲड. अजय मिसर यांना सदर प्रकरणी शासनाच्यावतीने विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून कामकाज पाहण्यासाठी खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**मा. विशेष मोक्का न्यायालय, सत्र न्यायालय, मुंबई**

अ) प्रतिदिन न्यायालयीन परिणामकारक सुनावणी फी - रु. ४०,०००/-
ब) विचारविनिमय फी (प्रति बैठक) - रु. ७,५००/-
क) निवास व्यवस्था - शासकीय विश्रामगृह/ प्रत्यक्ष निवास खर्च **(आवश्यकतेनुसार)**
ड) प्रवास खर्च - प्रत्यक्ष प्रवास खर्च
इ) सुरक्षा व्यवस्था - शासकीय धोरणाप्रमाणे

प्रस्तृत प्रकरणी ॲड श्री. मिसर यांना अपरिणामकारक सुनावणी फी व अन्य कोणतेही भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत.

२. ॲड. श्री. अजय मिसर यांना अनुज्ञेय असलेल्या व्यावसायिक फीचे प्रदान दर दोन महिन्याच्या न्यायालयीन कामकाजानंतर करण्यात यावे. न्यायालयीन कामकाजाचे परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान ॲड. श्री. अजय मिसर यांना होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलिस उपायुक्तांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०८), राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र. ४०४/२०/व्यय-७, दिनांक १९/१०/२०२० रोजी मिळालेल्या शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२९१८१९२७०७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Shyamrao Bhalerao

Digitally signed by Kishor Shyamrao Bhalerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a9c66c37cf4df25ecf07a096af23d69cb2e83d31183e8f9d61db36e6ca846c9e, serialNumber=94524ab889e2fa9e6bfe5e1e58426881bc36b968ffd0f45ce2d4bd3ff527ded2, cn=Kishor Shyamrao Bhalerao
Date: 2020.10.29 18:22:53 +05'30'

**( किशोर भालेराव )**
**उप सचिव (विधि), गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२. सह पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई.
३. पोलीस उपायुक्त(प्रकटीकरण), गुन्हे शाखा, मुंबई.
४. वरीष्ठ पोलीस निरीक्षक, खंडणी विरोधी पथक,गुन्हे प्रकटीकरण शाखा, गु.अ.वि., मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई .
६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. ॲड.श्री. अजय मिसर, ऑफिस नं.९, तळमजला, राजमहल बिल्डिंग, ॲम्बेसिडर हॉटेलजवळ, वीर नरिमन रोड, चर्चगेट, मुंबई ४०००२०
९. विधी व न्याय विभाग (अ शाखा), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (पोल-१०).